महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र. आगास-२००९/प्र. क्र. १९/जल-८
मंत्रालय , मुंबई -४०००३२
दिनांक : २१ जून, २००९.

**वाचा :**

(१) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. मृदसं-१०९२/ १११/प्र.क्र.२८/ ६ ए, दिनांक २० फेब्रुवारी, १९९२.
(२) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. आगास-१०९५/ प्र.क्र.१६४/जल-२३, दिनांक १७ जानेवारी, १९९६.
(३) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. आगास-१०९५/ प्र.क्र.१६४/जल-२३, दिनांक १५ मे, १९९६
(४) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. आगास-१०९६/ प्र.क्र.२३१/जल-२३, दिनांक १६ जानेवारी, १९९७.
(५) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. आगास-१०९९/ प्र.क्र.१०९/जल-२३, दिनांक १० फेब्रुवारी, २०००.
(६) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. आगास-१०९९/ प्र.क्र.१०९/जल-२३, दिनांक २५ फेब्रुवारी, २०००.
(५) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. आगास-१०००/ प्र.क्र.१/जल-२३, दिनांक १० एप्रिल, २०००.
(७) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. आगास-१०९५/ प्र.क्र.१६४/जल-२३, दिनांक १७ जानेवारी, १९९६.
(८) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. आगास-१०९६/ प्र.क्र.२३१/जल-२३, दिनांक १६ जानेवारी, १९९७.
(९) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. आगास-१०९६/ प्र.क्र.३/जल-८, दिनांक २९ नोव्हेंबर, २००८.
(१०) संचालक तथा सदस्य सचिव, आदर्शगांव संकल्प व प्रकल्प समिती यांचे पत्र क्र. आगास/ निधी/ तंत्र/२००९-१०/१८१/२००९, दिनांक ३१ मार्च, २००९.
(११) संचालक तथा सदस्य सचिव, आदर्शगांव संकल्प व प्रकल्प समिती यांचे पत्र क्र. आगास/ निधी/ तंत्र/२००९-१०/२१४/२००९, दिनांक १२ मे, २००९.

**प्रस्तावना :**

वर नमूद दिनांक २० फेब्रुवारी, १९९२ च्या शासन निर्णयान्वये श्री.अण्णा हजारे यांच्या अध्यक्षतेखाली आदर्शगांव संकल्प व प्रकल्प समितीची स्थापना करण्यात आली. त्यानंतर संदर्भांकित दिनांक १० एप्रिल, २००० च्या शासन निर्णयानुसार आदर्शगाव संकल्प व प्रकल्प समितीची पुनर्रचना करण्यात आली आहे. त्यानुसार मा.मंत्री (जलसंधारण) हे या समितीचे अध्यक्ष, मा.राज्यमंत्री (जलसंधारण) हे उपाध्यक्ष व संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे हे सदस्य सचिव आहेत. संदर्भांकित दिनांक २९ नोव्हेंबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये श्री.पोपटराव पवार, हिवरे बाजार, जि. अहमदनगर यांची आदर्शगांव संकल्प व प्रकल्प समितीच्या कार्याध्यक्ष पदावर नेमणूक करण्यात आली असून श्री.अण्णा हजारे, राळेगण सिध्दी, जि. अहमदनगर हे समितीचे प्रमुख मार्गदर्शक

आहेत. आदर्शगांव योजनेच्या निकषासंबंधी वेगवेगळे शासन निर्णय निर्गमित करण्यात आले आहेत. या निकषांपैकी काही निकषांमध्ये बदल करण्याच्या अनुषंगाने आदर्शगांव संकल्प व प्रकल्प समितीच्या राज्यस्तरीय समितीने वर नमूद दिनांक ३१ मार्च, २००९ व दिनांक १२ मे, २००९ च्या पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केला आहे. त्या अनुषंगाने आदर्शगांव योजनेचे काही निकष सुधारित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

प्रस्तादनेत नमूद केल्याप्रमाणे सन १९९२ पासून राबविण्यात येत असलेल्या आदर्शगांव योजनेच्या निकषासंबंधी वेळोवेळी शासन निर्णय निर्गमित करण्यात आले आहेत. या निकषांपैकी खाली नमूद केलेल्या निकषात पुढीलप्रमाणे बदल करण्यास शासन मंजुरी देत आहे :-

| अ.क्र. | विषय | सद्य:स्थितीतील निकष | सुधारित निकष |
|---|---|---|---|
| १ | गांव निवडीचे निकष | शासन निर्णय क्र.आगास-१०९९/ प्र.क्र.१०९/ जल-२३, दि.२५ फेब्रुवारी, २००० मध्ये नमूद केल्यानुसार आहेत. | नवीन गांवे निवडण्यासाठी सध्याचे निकष कायम राहतील. त्याव्यतिरिक्त विविध ग्राम अभियानात पुरस्कार प्राप्त/ सहभागी गांवे, तंटामुक्त गांवे, महाराष्ट्र ग्रामीण रोजगार हमी योजनेमधील काम करण्यास तयार असणारी गांवे, राष्ट्रीय सेवा योजनेत समाविष्ट गांवे, आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांची गांवे यांचा प्राधान्याने समावेश करण्यात यावा. |
| २ | संस्था निवडीचे निकष | सध्याचे निकष शासन निर्णय क्र.आगास-१०९९/ प्र.क्र.१०९/ जल-२३, दि.२५ फेब्रुवारी, २००० मध्ये नमूद केल्यानुसार आहेत. त्यानुसार सध्या संस्थेचे मागील दोन वर्षाचे ऑडिट रिपोर्ट घेतले जातात. | इतर निकषात बदल नाही. संस्थेचे मागील दोन ऐवजी तीन वर्षांचे ऑडिट रिपोर्ट प्रस्तावासोबत सादर करणे आवश्यक राहील. |
| ३ | गांव / संस्था वगळण्याचे निकष | शासन निर्णय क्र.आगास-१०९९/ प्र.क्र.१०९/ जल-२३, दि.२५ फेब्रुवारी, २००० मध्ये नमूद केल्यानुसार निधी मिळाल्यापासून १ वर्षात काम सुरु न केलेली गावे/संस्था, तसेच सतत २ वर्षे लेखा परीक्षणाची हिशोबपत्रके सादर न करणारी गावे/संस्था यांना वगळण्याची अट आहे. | शासन निर्णय क्र.आगास - १०९९/ प्र.क्र.१०९/ जल-२३, दि.२५ फेब्रुवारी, २००० मध्ये नमूद अटींमध्ये अट क्र. १ व ४ ही अनुक्रमे निधी मिळाल्यापासून ६ महिन्यात काम सुरु न केलेली गावे/संस्था, तसेच आर्थिक वर्ष संपल्यानंतर ६ महिन्याच्या कालावधीत लेखा परीक्षणाची हिशोबपत्रके सादर न करणारी गावे/संस्था यांना वगळणे अशी सुधारित करण्यात येत आहे. |

- - - ३/-

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | निधी नियोजनाबाबत | सद्य:स्थितीत कपार्टच्या मार्गदर्शक सूचनानुसार निधीचे नियोजन शासन निर्णय क्र.आगास-१०९५/ प्र.क्र.११७/जल-२३, दि.२४ मे,१९९६ अन्वये करण्यात आले आहे. त्यानुसार प्रकल्पाच्या घटकांचे खर्चाचे प्रमाण पुढीलप्रमाणे आहे.<br>अ) पाणलोट कामे - ७५ टक्के<br>ब) पाणलोट सामाजिक संघटन-५ टक्के<br>क) प्रशिक्षण- ५ टक्के<br>ड) प्रशासकीय खर्च - १५ टक्के<br>एकूण १०० टक्के | जुन्या कार्यान्वीत गावांसाठी सुधारित मापदंडानुसार दि.१/४/२००९ रोजी शिल्लक असलेल्या कामांसाठी प्रकल्प आराखडे सुधारित करण्यात यावेत. तथापि, पाणलोट सामाजिक संघटन, प्रशिक्षण व प्रशासकीय खर्च यासाठी जुन्या मापदंडाच्या रकमेइतकाच खर्च येईल याची दक्षता घेण्यात यावी.<br>नविन निवड झालेल्या गावांसाठी केंद्र शासनाच्या सामाईक मार्गदर्शक सूचनांमधील तरतुदींचा अवलंब करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. |
| ५ | आदर्शगाव संकल्प व प्रकल्प समितीच्या दैनंदिन कामकाजासाठी समिती स्थापन करणे. | शासन निर्णय क्र.आगास-१०९६/ प्र.क्र.२३१/ जल-२३, दि. १६ जानेवारी, १९९७ अन्वये त्रिसदस्यीय समिती, आदर्श गांव समितीचे दैनंदिन कामकाज /तातडीने करावयाचे कामकाज पार पाडण्यासाठी गठीत करण्यात आली होती. सद्य:स्थितीत सदर कामकाज कार्याध्यक्ष, निमंत्रक व सदस्य सचिव यांची त्रिस्तरीय समिती पार पाडत आहे. | सदर त्रिस्तरीय समिती राज्यस्तरीय उपसमिती म्हणून घोषित करण्यास शासन मंजूरी देत आहे. |
| ६ | योजनेचे मूल्यमापन | आदर्शगांव योजनेचे मुल्यांकन अफार्म, पुणे या संस्थेमार्फत सन १९९८ या वर्षात करण्यात आले आहे. | आदर्शगांव योजनेचे मुल्यमापन त्रयस्थ संस्थेकडून दर तीन वर्षांनी करण्यात यावे. त्रयस्थ संस्थेची निवड मा. मंत्री (जलसंधारण) यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय समितीमार्फत करण्यात यावी. मुल्यमापनासाठी येणारा खर्च त्या त्या वर्षाच्या मंजूर अर्थसंकल्पीत तरतूदीमधून भागविण्यात यावा. |

२. उपरोक्त अनु. क्र. ४ वगळता इतर सुधारित निकष हे हा शासन निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू राहतील.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २००९०६२९१८१८०२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रेखा भिडे )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा.मंत्री (जलसंधारण) तथा पदसिध्द अध्यक्ष, आदर्शगांव संकल्प व प्रकल्प समिती यांचे खाजगी सचिव,

मा.मंत्री/मा.राज्यमंत्री, मंत्रालयीन विभाग,
मा.राज्यमंत्री (जलसंधारण) तथा पदसिध्द उपाध्यक्ष, आदर्शगांव संकल्प व प्रकल्प समिती यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव यांचे सचिव,
अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद
श्री.अण्णासाहेब हजारे (प्रमुख्य मार्गदर्शक, आदर्शगांव संकल्प व प्रकल्प समिती), राळेगण सिध्दी, ता.पारनेर, जि.अहमदनगर,
श्री.पोपटराव पवार (कार्याध्यक्ष,आदर्शगांव संकल्प व प्रकल्प समिती), हिवरे बाजार, मार्केट यार्ड, महानगर बँकेशेजारी, अहमदनगर.
प्रा.अरुण निकम, वनश्री, गजानन कन्स्ट्रक्शन एरिया, भडगांव रोड, चाळीसगांव, जिल्हा-जळगांव,
महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषदेचे सर्व अशासकीय सदस्य,
विभागीय आयुक्त (सर्व)
कृषि आयुक्त, पुणे-१,
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
संचालक, (मृदसंधारण), कृषि आयुक्तालय, पुणे-१,
संचालक, फलोत्पादन, शिवाजीनगर, पुणे-५,
संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,
महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई-२०,
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
संचालक, प्रौढ शिक्षण, पुणे-१
संचालक, समाजकल्याण, पुणे-१,
आरोग्य संचालक, सेंट जॉर्जेस हॉस्पीटल, मुंबई-१,
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व),
विभागीय कृषि सह संचालक (सर्व),
जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी (सर्व),
उपसंचालक, आदर्श गांव संकल्प व प्रकल्प समिती, पुणे
सर्व सह/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती, जल-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

---